महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या प्रशासकीय कामकाजावरील खर्चासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग,**

**शासन ज्ञापन क्रमांक कौविउ-२०२३/प्र.क्र.१०७/कौशल्य -१**

२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि. १७ /०४/२०१५.

२. वित्त विभाग,शासन परिपत्रक,क्र. अर्थसं.-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३/दिनांक १२/०४/२०२३.

३. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS/ PMKUVA/२०२३२-४/६३६, दिनांक २२/०६/२०२३.

४. कौ.रो.उ.व ना.वि./शासन ज्ञापन क्र.२०२३/प्र.क्र.१०७/कौशल्य-१ / दिनांक २७/०७/२०२३

५. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS/ PMKUVA/२०२३-२४/ १३७०/दि. २३/१०/२०२३.

६. कौ.रो.उ.व ना.वि./शासन ज्ञापन क्र.२०२३/प्र.क्र.१०७/कौशल्य-१ / दि. ०३/११/२०२३

७. वित्त विभाग,शासन परिपत्रक,क्र. अर्थसं.-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३/दि.०४/०३/२०२४

८. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS/ PMKUVA/२०२३- २४/ ११८७/, दि. ०४/०३/२०२४ रोजीचे पत्र.

**ज्ञापन :-**

राज्यात कौशल्य विकासाशी निगडीत विविध उपक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी “महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी” ही “नोडल एजन्सी” म्हणून कार्यरत आहे. सदर संस्थेने, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात संस्थेच्या कामकाजावरील खर्चासाठी मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (०९) महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था (२२३० ६१२७), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्याची विनंती सं.क्र.८ येथील पत्रान्वये केली आहे.

२. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये माहे डिसेंबर, २०२३ मध्ये रु. १४.०० कोटी इतका निधी सुधारित अंदाजाच्या मर्यादेत अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. अर्थसंकल्पित निधीमधून रु. १०.०० कोटी इतका सं.क्र. ४ व ६ येथील ज्ञापनान्वये महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीला कामकाजावरील खर्चासाठी वितरीत केला आहे.

३. महराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या सं.क्र. ८ येथील विनंती तसेच वित्त विभागाच्या सं.क्र. ७ येथील परिपत्रकास अनुसरुन “महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था” या योजनेंतर्गत शिल्लक असलेला रु. ४.०० कोटी (रु. चार कोटी फक्त) इतका निधी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीला कार्यालयीन खर्चासाठी वितरीत व खर्च करण्यास सदरहू ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर निधी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,नवी मुंबई यांनी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीस तात्काळ उपलब्ध करुन देऊन या संदर्भातील लेखे अद्ययावत ठेवावेत. याकरिता आयुक्त, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांना

"नियंत्रक अधिकारी" तसेच सहायक संचालक (लेखा) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,नवी मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. उपरोक्त निधी ज्या कारणास्तव उपलब्ध करुन देण्यात आला आहे त्याच कारणास्तव विहित कालावधीत खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांची राहील. तसेच प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित कालमर्यादेत सादर करण्याची दक्षता आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांनी घ्यावी. उक्त निधी खर्च करताना वित्त विभागाच्या उपरोक्त सं.क्र. २ व ३ येथील शासन निर्णय व परिपत्रकातील तरतुदींचे तसेच नियोजन, वित्त यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचना/निकष/अटी/शर्तींचे आणि उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने खरेदी विषयक वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतुदींचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

६. या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१)(०९) महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास संस्था (२२३० ६१२७), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदरहू ज्ञापन, वित्त विभागाच्या सं.क्र.२ येथील दिनांक १७/०४/२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत करण्यात आलेल्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिकान्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार आणि वित्त विभागाच्या सं.क्र.३ व ७ येथील परिपत्रकास अनुसरुन तसेच वित्त विभाग अ.नौ. सं.क्र. ८३/ व्यय-६- दि. १५ मार्च, २०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३२८१२४१४२२४०३ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITHUN MOHANRAO SALUNKHE

Digitally signed by MITHUN MOHANRAO SALUNKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTERPREUNERSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=eb410b645758d07ea6303743e3a96f12f7b5ea5c78305aa3546f1b05a4d188d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=928224E8C07F06F0A63241EEC16360F9961117B3DFDA771ED6746D1433B5EA7A, cn=MITHUN MOHANRAO SALUNKHE
Date: 2024.03.28 12:51:11 +05'30'

**( मिथुन साळुंखे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
५. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
६. कार्यासन अधिकारी, प्रशा-३ कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (कौशल्य -१), कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.